सरकारी वकील कार्यालय, उच्च न्यायालय, अपील शाखा, रिटसेल, मुंबई या र्यालयातील ४२ रिक्त पदे बाहय यंत्रणेमार्फत भरण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत...

# महाराष्ट्र शासन

**विधि व न्याय विभाग,**

**शासन निर्णय, क्रमांक: सवरि-१४१७/प्र.क्र.११९/१७/का-८,**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई: ४०० ०३२.
दिनांक: ०४ फेब्रुवारी, २०२०.

संदर्भ :-१) सरकारी वकील, सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय, अपील शाखा (रिटसेल), मुंबई यांचे पत्र जा.क्र.आस्था/रिटसेल/१५४६४/२०१९, दि.०९.१२.२०१९ व पत्र जा.क्र.आस्था/रिटसेल/११८३५/२०१९, दि.१६.०९.२०१९

२) विधि व न्याय विभाग, शासन पत्र क्रमांक: सवरि-१४१५/प्र.क्र.९९/१५/कार्या-८, दि.८.६.२०१६. (सरळसेवेच्या कोटयातील ९ पदे बाहय यंत्रणेमार्फत भरण्यासंदर्भात)

३) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय, क्रमांक: सवरि-१४१७/प्र.क्र.११९/१७/कार्या-८, दि.७.९.२०१७. (२६ नवीन पदांची निर्मिती)

४) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय, क्रमांक: सवरि-१४१७/प्र.क्र.११९/१७/कार्या-८, दि.२२.९.२०१७. (९ नवीन पदांची निर्मिती)

५) मुंबई उच्च न्यायालयातील रिट पिटीशन क्रमांक: २१४१/१९९० मध्ये मा.उच्च न्यायालयाने दि.२.११.२०१८ रोजी दिलेले आदेश.

६) विधि व न्याय विभाग, शासन पत्र, क्रमांक: सवरि-१४१७/प्र.क्र.११९/१७/कार्या-८, दि.१६.२.२०१८ (४२ पदे बाहय यंत्रणेच्या माध्यमातून भरण्याबाबत.)

७) वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक: पदनि-२०१६/प्र.क्र.३०/२०१६/आपुक, दि.२५.५.२०१७. (सुधारित आकृतीबंधाला मंजूरी घेतल्याशिवाय सरळसेवेच्या कोटयातील पदांचे मागणीपत्र महाराष्ट्र लोकसेवा आयोगाला न पाठविण्याचे धोरण.)

८) विधि व न्याय विभाग, पत्र क्रमांक: सवरि-१४१७/प्र.क्र.११९/१७/कार्या-८, दि.१५.११.२०१८ (ई-निविदेच्या माध्यमातून सेवा पुरवठादार कंपनीची निवड करण्यासंदर्भात निर्देश).

९) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम (भाग-२), दि.१७.४.२०१५. (वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८,भाग पहिला, उपविभाग-४, अनुक्रमांक ११.)

१०) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्रमांक: पदनि-२०१३/प्र.क्र.११/२०१३/विसु-१, दि.२.२.२०१३

११)वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्रमांक: पदनि-२०१३/प्र.क्र.११२/२०१३/विसु-१, दि.२.१२.२०१३

१२) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्रमांक: पदनि-२०१३/प्र.क्र.११२/२०१३/विसु-१, दि.१९.१२.२०१३.

१३) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्रमांक: पदनि-२०१०/प्र.क्र.८४/१०/विसु-१, दि.२७.९.२०१०.

१४) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्रमांक: पदनि-२०१६/प्र.क्र.२९/१६/विसु-१, दि.२.८.२०१६.

१५) वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक: पदनि-२०१८/प्र.क्र.११३/आपुक, दि.११.१२.२०१८.

**प्रस्तावना :-**

सरकारी वकील, सरकारी वकील यांचे कार्यालय, उच्च न्यायालय, अपील शाखा (रिटसेल), मुंबई यांच्या दि.९.१२.२०१९ रोजीच्या पत्रान्वये कळविलेले आहे की, त्यांच्या कार्यालयातील ४२ रिक्त पदे बाहय यंत्रणेद्वारे भरण्यासाठी त्यांनी ई-निविदेच्या माध्यमातून श्री.साई माऊली तांत्रिक व अभियांत्रिकी स्वयंरोजगार सेवा सहकारी संस्था मर्या.यतवमाळ या संस्थेची निवड केलेली असून, सदर संस्थेशी २ वर्षांचा करार करण्यात आलेला आहे. त्या अनुषंगाने, दि.१.१०.२०१९ पासून ४० पदे सदर संस्थेमार्फत बाहय यंत्रणेच्या माध्यमातून भरण्यात आलेली आहेत. तरी, सदर प्रस्तावाला प्रशासकीय मान्यता द्यावी.

२. सरकारी वकील, सरकारी वकील कार्यालय, उच्च न्यायालय, अपील शाखा, (रिटसेल), मुंबई यांच्या वरील प्रस्तावाच्या अनुषंगाने नमूद करण्यात येते की, -----

(अ) त्यांच्या कार्यालयातील लघुलेखक (उच्चश्रेणी) १ पद, लघुलेखक (निम्नश्रेणी) १ पद, लिपिक-टंकलेखक ३ पदे, आणि शिपाई ४ पदे अशी एकूण ९ पदे बाहय यंत्रणेमार्फत तात्पुरत्या स्वरुपात भरण्यास वित्त् विभागाकडून प्राप्त झालेल्या मान्यतेच्या अनुषंगाने, सरकारी वकील कार्यालर्याला विधि व न्याय विभागाने दि.८.६.२०१६ रोजीच्या शासन पत्र क्रमांक: सवरि-१४१५/प्र.क्र.९९/१५/का-८ अन्वये मान्यता देण्यात आलेली होती.

(ब) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय, क्रमांक : सवरि-१४१७/प्र.क्र.११९/१७/का-८, दि.७.९.२०१७ अन्वये सरकारी वकील कार्यालय, उच्च न्यायालय, अपिल शाखा (रिटसेल), मुंबई या कार्यालयासाठी अधिक्षक १ पद, लघुलेखक (उच्चश्रेणी) १ पद, लघुलेखक (निम्नश्रेणी) ३ पदे, लिपिक-टंकलेखक १२ पदे, शिपाई ८ पदे व बांधणीकार १ पद याप्रमाणे एकूण २६ पदे, मा.उच्च न्यायालयाने याचिका क्र.२१४१/१९९० मध्ये दि.११.८.२०१७ रोजी सुनावणी दरम्यान दिलेल्या आदेशाच्या अनुषंगाने, उच्चस्तर समितीच्या मान्यतेने, नव्याने निर्माण करण्यात आलेली आहेत.

(क) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय, क्रमांक: सवरि-१४१७/प्र.क्र.११९/१७/का-८, दि.२२.९.२०१७ अन्वये सरकारी वकील कार्यालय, उच्च न्यायालय, अपिल शाखा (रिटसेल), मुंबई या कार्यालयासाठी लिपिक-टंकलेखक ३ पदे, शिपाई ६ पदे याप्रमाणे एकूण ९ पदे, मा.उच्च न्यायालयाने याचिका क्र.२१४१/१९९० मध्ये दि.८.९.२०१७ रोजी सुनावणी दरम्यान दिलेल्या आदेशाच्या अनुषंगाने, उच्चस्तर समितीच्या मान्यतेने, नव्याने निर्माण करण्यात आलेली आहेत.

(ड) सारांशाने, वरील (अ) मध्ये नमूद ९ पदे व (ब) मध्ये नमूद २६ पदांपैकी अधिक्षक आणि बांधणीकार ही २ पदे वगळून एकूण २४ पदे आणि (क) मध्ये नमूद ९ पदे अशी एकूण ४२ पदे बाहय यंत्रणेच्या माध्यमातून तात्पुरत्या स्वरुपात भरण्यास विधि व न्याय विभाग, शासन पत्र क्रमांक: सवरि-१४१७/ प्र.क्र.११९/

१७/का-८, दि.१६.२.२०१८ अन्वये, शासन मंजूरी देण्यात आलेली होती. मा.उच्च न्यायालयाच्या आदेशानुसार पदे तातडीने भरणे आवश्यक होते. यास्तव वरीलप्रमाणे कार्यवाही करण्यात आली.

(इ) सरकारी वकील, सरकारी वकील कार्यालय, उच्च न्यायालय, अपिल शाखा (रिटसेल), मुंबई यांनी सदर ४२ पदे बाहय यंत्रणेच्या माध्यमातून भरण्यासाठी ई-निविदा मागविण्याऐवजी तातडीची गरज म्हणून उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या पॅनलवरील मे.क्रिस्टल इंटिग्रेटेड सर्विसेस प्रा. लि. या सेवा पुरवठादार कंपनीकडून सदर ४२ पदे बाहय यंत्रणेच्या माध्यमातून भरली, सदर पदांना वेळोवेळी मुदतवाढ देण्यात आली. लोकसेवा आयोगाच्या माध्यमातून नियमित उमेदवार उपलब्ध होईपर्यंतच्या कालावधीसाठी सदर मुदतवाढ विशिष्ट कालावधीसाठी वेळोवेळी आवश्यकतेनुसार देण्यात आलेली आहे.

(ई) सरकारी वकील, सरकारी वकील कार्यालय, उच्च न्यायालय, अपिल शाखा (रिटसेल), मुंबई या कार्यालयातील सरळसेवेच्या/नामनिर्देशनाच्या कोटयातील पदे ही महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत भरली जातात. परंतु, सुधारित आकृतीबंधाला मंजूरी घेतल्याशिवाय सरळसेवेच्या कोटयातील पदांचे मागणीपत्र महाराष्ट् लोकसेवा आयोगाला पाठविण्यात येणार नाही, असे धोरण वित्त विभागाने शासन निर्णय, क्रमांक: पदनि-२०१६/प्र.क्र.३०/२०१६/आपुक, दि.२५.५.२०१७ अन्वये निश्चित केल्याने, सरळसेवेच्या कोटयातील रिक्त पदे भरण्यासंदर्भातील मागणीपत्र सामान्य प्रशासन विभागामार्फत लोकसेवा आयोगाला दिर्घकाळापासून पाठविण्यात आलेले नाही. सुधारित आकृतीबंधाचा प्रस्ताव उप समितीपुढे ठेवण्यासाठी वित्त विभागाला (आपुक कक्ष) सादर करण्यात आलेला आहे. उप समितीच्या मान्यतेनंतर मा.मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखालील उच्चस्तर समितीपुढे सदर प्रस्ताव सादर करावा लागेल. उच्चस्तर समितीच्या मान्यतेनंतर सुधारित आकृतीबंधाचा शासन निर्णय निर्गमित करण्यात येईल. त्यानंतर, सरळसेवेच्या कोटयातील रिक्त पदांचे मागणीपत्र सामान्य प्रशाासन विभागामार्फत महाराष्ट्र लोकसेवा आयोगाला पाठवावे लागेल. त्यानंतर, नियमित उमेदवार उपलब्ध होण्यासाठी सुमारे १ वर्षाचा कालावधी लागेल. एकंदर सदर वस्तुस्थिती विचारात घेता, नियमित उमेदवार होईपर्यंतच्या कालावधीसाठी ४२ रिक्त पदे बाहय यंत्रणेच्या माध्यमातून भरणे आवश्यक आहे.

(उ) उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने शासन निर्णय, क्रमांक: काआआ-२०१३/प्र.क्र.२३६/कामगार-८, दि.१८.६.२०१४ अन्वये मे. क्रिस्टल इंटिग्रेटेड सर्विसेस प्रा. लि. या सेवा पुरवठादार कंपनीला ३ वर्षाच्या कालावधीसाठी मान्यता दिलेली होती. त्यानंतर वेळोवेळी सदर कंपनीला मुदतवाढ देण्यात आलेली होती. म्हणून विधि व न्याय विभाग, पत्र क्रमांक: सवरि-१४१७/प्र.क्र.११९/१७/कार्या-८, दि.१५.११.२०१८ अन्वये सरकारी वकील, सरकारी वकील कार्यालय, उच्च न्यायालय, अपिल शाखा (रिटसेल), मुंबई या कार्यालयाच्या आस्थापनेवरील सदर कंपनीमार्फत भरण्यात आलेल्या ४२ पदांसंदर्भात मुदतवाढ देताना, सरकारी वकील कार्यालयाला निर्देश देण्यात आलेले होते की, त्यांनी स्वत: ई-निविदेच्या माध्यमातून सेवा पुरवठादार कंपनीची निवड करावी. त्या अनुषंगाने, सरकारी वकील कार्यालयाने ई-निविदेच्या माध्यमातून "श्री. साई माऊली तांत्रिक व अभियांत्रिकी स्वयंरोजगार सेवा सहकारी संस्था मर्या. यवतमाळ" या संस्थेची निवड करुन, सदर संस्थेमार्फत, २ लघुलेखक (उच्चश्रेणी), ४ लघुलेखक (निम्नश्रेणी), १८ लिपिक व १८ शिपाई अशा मान्यता मिळालेल्या एकूण ४२ पदांपैकी ४० पदे दि.१.१०.२०१९ रोजी पासून निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात बाहय यंत्रणेच्या माध्यमातून भरलेली आहेत.

त्यासंदर्भात, विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्रमांक सवरी-२५१२/प्र.क्र.१५७/का.१२, दि.२७.०१.२०१५ च्या अनुक्रमांक ८ मध्ये नमुद केल्याप्रमाणे, दि.२३.९.२०१९ रोजी सदर संस्थेबरोबर २ वर्षांचा करारनामा करण्यात आलेला आहे. त्या अनुषंगाने, प्रस्तावाला प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती सरकारी वकील, सरकारी वकील कार्यालय, उच्च न्यायालय, अपिल शाखा (रिटसेल), मुंबई यांनी केलेली आहे.

३. वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक: पदनि-२०१८/प्र.क्र.११३/आपुक, दि.११.१२.२०१८ अन्वये, बाहय यंत्रणेमार्फत सेवा उपलब्ध करुन घेण्यासंदर्भात सुधारित सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. सदर शासन निर्णयातील तरतुदीनुसार गट-ब (अराजपत्रित संवर्गातील) तांत्रिक कौशल्य असलेली पदे व गट-क संवर्गातील सरळसेवेच्या कोटयातील मंजूर पदांपैकी रिक्त असलेल्या पदांच्या ७० टक्के इतक्या मर्यादेत काल्पनिक पदे निर्माण करुन सदर पदे भरण्याचे अधिकार प्रशासनीक विभागाला प्रदान करण्यात आलेले आहेत. तथापि, प्रस्तुत प्रकरणात रिट पिटीशन क्रमांक २१४१/१९९० मध्ये वेळोवेळी झालेल्या सुनावणीदरम्यान मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या आदेशांच्या अनुषंगाने, एकूण ४२ रिक्त पदे (लिपिक-टंकलेखक-१८ पदे, लघुलेखक-उच्चश्रेणी २ पदे, लघुलेखक-निम्नश्रेणी, ४ पदे आणि शिपाई -१८ पदे), बाहय यंत्रणेमार्फत निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात भरण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. आता, ई निवीदेच्या माध्यमातुन निवडलेल्या, “श्री.साई माऊली तांत्रिक व अभियांत्रिकी स्वयंरोजगार सेवा सहकारी संस्था मर्या. यवतमाळ” या कंपनीमार्फत बाहययंत्रणेच्या माध्यमातुन ४२ रिक्त पदे दिनांक १.१०.२०१९ पासुन नियमीत पदे भरण्याची भरती प्रक्रीया पूर्ण होईपर्यंत किंवा २४ महिने यापैकी जे आधी घडेल, या कालावधीसाठी भरण्याच्या प्रस्तावाला शासन मंजूरी देण्यात येत आहे. सदरच्या ४२ पदांवर होणारा खर्च/ कामाचे प्रदान हा “कार्यालयीन खर्च” या शिर्षाखालील मंजुर अनुदानातुन भागविण्यात यावा.

४. वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम (भाग-२), दि.१७.४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-१ ला उपविभाग-४, अनुक्रमांक ११ मधील तरतुदीनुसार आणि रिट पिटीशन क्रमांक २१४१/१९९० मधील मा.उच्च न्यायालयाचे आदेश विचारात घेऊन सदरच्या प्रस्तावाला शासन मंजुरी देण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२०४१२४९१९९०१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shweta Shrikrishna Sawant

Digitally signed by Shweta Shrikrishna Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=b3ca42e7e8a1e79d299641a8dd9af497a49877ed8adb4f6fa50732d337966b34, serialNumber=0a9b2187e527bdef2e336ce0dcbf5940891b24b7bc13811ba26ac1ede1c2f1c6, cn=Shweta Shrikrishna Sawant
Date: 2020.02.04 12:59:08 +05'30'

**( श्वेता सावंत )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. प्रधान सचिव व विधि परामर्शी, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.

२. सरकारी वकील, सरकारी वकील कार्यालय, उच्च न्यायालय, अपील शाखा (रिटसेल), मुंबई.

३. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६. आस्थापना अधिकारी, सरकारी वकील कार्यालय, उच्च न्यायालय, अपील शाखा (रिटसेल), मुंबई.
७. वित्त विभाग (विनियम/ विसु-१), मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती (कार्या-८)